**<u>चित्री मध्यम प्रकल्प ता.आजरा, जि.कोल्हापूर</u>**
**द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रस्ताव ...**

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र.चित्री/सुप्रमा-२००९/६०६/(१८७/०९)/मध्यम प्रकल्प
मंत्रालय, मुंबई
दिनांक :- २२/१०/२०१०

पहावे : १) शासन निर्णय क्र. सी.एच.आर.१०८६/३८४८/(९२/८९), दिनांक ८.२.१९८९.
२) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे क्र. ३८७४,
. दिनांक २७.४.२०००.

**<u>प्रस्तावना :-</u>**

कोल्हापूर जिल्हयातील आजरा तालुक्यातील चित्री मध्यम प्रकल्पास शासन निर्णय क्र. सी.एच.आर./१०८६/३८४८/(९२/८९), दिनांक ८.२.१९८९ अन्वये (दरसूची १९८६-८७ वर आधारित) रुपये १२३०.२७ लक्ष (रुपये बाराकोटी तीस लक्ष सत्तावीस हजार फक्त) एवढया किंमतीस मूळ प्रशासकिय मान्यता प्रदान देण्यात आली होती. तद्नंतर सर्वसाधारण भाववाढीमुळे, दरसुचीत झालेली वाढ, संकल्पचित्र संघटनेने सुचविलेले बदलामुळे झालेली वाढ, सिंचन तथा विद्युत विमोचकाची तरतुदीमुळे वाढ इत्यादी कारणामुळे प्रकल्पाचे किंमतीत वाढ होऊन प्रकल्पास कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णाखोरे विकास महामंडळ निर्णय क्रमांक ३८७४, दिनांक २७.४.२००० अन्वये (दरसुची १९९६-९७ वर आधारीत) रुपये ७९९४.०६ लक्ष (रुपये एकोणऐंशी कोटी चौऱ्यान्नव लक्ष सहा हजार फक्त) एवढ्या किमतींस प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. तद्नंतर ते आतापर्यंन्तच्या दरसुचीतील भाववाढीमुळे, भुसंपादनाच्या किंमतीतील वाढीमुळे संकल्प चित्रातील बदलामुळे, मुळ अंदाजपत्रकात नसलेल्या परंतु आता नवीन बाबींचा अंतर्भाव सुधारीत अहवालात केल्यामुळे तसेच प्रकल्पाच्या जागेचा अंशतः बदल इत्यादी कारणांमुळे प्रकल्पाच्या किंमतीत वाढ झाली आहे. यासाठी कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णाखोरे विकास महामंडळ, पुणे यांनी त्यांचे जा.क्र.२०५/२३६/२००५/मप्र-३/४४३२/मकृखोविम, दिनांक ३०.६.२००९ अन्वये सादर केलेल्या द्वितीय सुधारीत प्रशासकीय अहवालास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय</u>** :-

शासनाकडून आता या निर्णयाद्वारे कोल्हापूर जिल्हयातील आजरा तालुक्यातील चित्री मध्यम प्रकल्पाच्या कामासाठी सन २००८-०९ च्या दरसूचीवर आधारित रु.१००१०.०७ लक्ष (रुपये शंभर कोटी दहालक्ष सात हजार फक्त) एवढया रकमेस द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. त्यापैकी रुपये ९२९६.०९ लक्ष (रुपये ब्यान्नव कोटी शहान्नव लक्ष नऊ हजार फक्त) कामाप्रित्यर्थ व रुपये ७१३.९७ लक्ष (रुपये सात कोटी तेरा लक्ष सत्त्यानव हजार फक्त) अनुषंगिक खर्च आहे. सोबत सहपत्र-१ मध्ये सुधारित उपशीर्षवार तरतूद व सहपत्र-२ मध्ये सुधारित सर्वसाधारण गोषवारा दिला आहे.

१. सदर प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व सुधारित प्रशासकीय प्रस्तावाच्या तरतुदीच्या मर्यादेत पूर्ण करणेत यावे.

२. या योजनेस प्रदान केलेली द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता मध्यम प्रकल्प कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये अ.क्र. ३(२०१०-१०) वर नोंदविण्यात आली आहे.

३. या प्रकल्पामुळे कोल्हापूर जिल्हयातील आजरा तालुक्यातील ५८५० हेक्टर क्षेत्रास सिंचनाचा लाभ होणार आहे. प्रकल्पाचे लाभव्यय परिमाण २.८७ आहे.

४. या योजनेच्या कामावर होणारा खर्च लेखाशीर्ष आय-५/४७०१ मोठे व मध्यम प्रकल्प यावरील भांडवली खर्च-८० सर्वसाधारण, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका (०२) (०१) महाराष्ट्र कृष्णाखोरे विकास महामंडळ, पुणे या महामंडळास भाग भांडवली अंशदान (योजना अंतर्गत) (४७०१ एच ७६३) चित्री मध्यम प्रकल्प याखाली खर्ची टाकावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हा निर्णय शासन पाटबंधारे विभाग निर्णय क्र.संकीर्ण १०९९/(१२६/९९) मोप्र (प्र) दिनांक १८.५.९९ च्या आदेशातील तरतुदीनुसार तसेच नियोजन विभागाचे अनौपचारीक संदर्भ क्रमांक २१५९, दिनांक २१.१.२०१० नुसार दिलेल्या सहमतीने व वित्त विभागाने अनौपचारीक संदर्भ क्रमांक २६/व्यय-१२, दिनांक १.२.२०१० नुसार दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०१०१०२२१४५३०६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सहपत्र : वरीलप्रमाणे १ व २

**( र.स.गुजर)**
**शासनाचे अवर सचिव**

प्रत सहपत्रासह अग्रेषित :-

महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
वित्त विभाग (व्यय-१२) अर्थ-२, अर्थ-१०, व्यय-६ अ, मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग (कार्यासन १४६१), मंत्रालय, मुंबई
कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णाखोरे विकास महामंडळ, पुणे.
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे.
आंतरवित्त सल्लागार व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता, कोल्हापूर पाटबंधारे मंडळ, कोल्हापूर. (सोबत सुधारित अंदाजपत्रक)
कार्यकारी अभियंता, मध्यम प्रकल्प विभाग क्रमांक-२, कोल्हापूर
स्वीय सहायक, मा.मंत्री (जलसंपदा) (कृ.खो.पा.वि.महामंडळ), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, मा.राज्यमंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, सचिव (जलसंपदा) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, सचिव (लाभक्षेत्र विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता (कृ.खो.पा.वि.महामंडळ) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, उप सचिव (मोप्र-१) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अवर सचिव (म.प्र.) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उप अभियंता (म.प्र.), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासने : जसंअ, निवसं-१, अर्थ-१, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासन मध्यम प्रकल्प, संग्रहार्थ
निवड धारिका.

**तक्ता क्रमांक १**

**चित्री मध्यम प्रकल्प ता. आजरा, जिल्हा कोल्हापूर**

**शासन निर्णय क्र. सुप्रमा/२००९/६०६/(१८७/०९)/मध्यम प्रकल्प दिनांक २२.१०.२०१० चे**

**सहपत्र**

**द्वितीय सुधारित अंदाजपत्रक उपशिर्षवार तरतुदी**

| **अ.क्र.** | **उपशीर्ष** | **सुधारित प्रस्तावित अंदाजपत्रक (रुपये लक्ष)** |
|---|---|---|
| **१** | **२** | **३** |
| १) | "अे" प्राथमिक सर्वेक्षण | २२.९८ |
| २) | "बी" भूसंपादन | १५४५.८० |
| ३) | "सी" कामे | ६४५१.४१ |
| ४) | "डी" विमोचक | १००८.९४ |
| ५) | "ई " फॉल्स | --- |
| ६) | "एफ" आर.एच.टी.कामे | --- |
| ७) | "जी" ब्रिजेस | --- |
| ८) | "एच" एस्केप | --- |
| ९) | "के" इमारती | १०९.८४ |
| १०) | "एल" मातीकाम | --- |
| ११) | "एम" वृक्षारोपण | ०.५० |
| १२) | "ओ" संकिर्ण | ३०.३६ |
| १३) | "पी" देखभाल व दुरुस्ती | २५.८७ |
| १४) | "क्यू" हत्यारे व संयत्रे | --- |
| १५) | "आर" दळणवळण | १००.३९ |
| १६) | वितरीका भाग-३ | --- |
| १७) | पादचाऱ्या | --- |
| | एकूण कामाप्रित्यर्थ | ९२९६.०९ |
| | आस्थापना व अनुषंगिक खर्च | ७१३.९७ |
| | **एकूण** | **१००१०.०७** |

**तक्ता क्रमांक २**

**चित्री मध्यम प्रकल्प ता. आजरा, जिल्हा कोल्हापूर**

**शासन निर्णय क्र. सुप्रमा/२००९/६०६/(१८७/०९)/मध्यम प्रकल्प दिनांक २२.१०.२०१० चे**

**सहपत्र**

**द्वितीय अंदाजपत्रक सर्वसाधारण संकलित गोषवारा**

| अ.क्र. | विवरण | रक्कम (रुपये लक्ष) |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| (अ) | **प्रत्यक्ष खर्च**<br>१) शीर्षकामे<br>२) कालवे | <br>९२९६.०९<br>---<br>--- |
| | **एकूण (अ)** | **९२९६.०९** |
| (ब) | **अधिक**<br>१) आस्थापना खर्च (ब-जमिन वगळून)८.०० टक्के<br>२) हत्यारे व अवजारे १.० टक्के दराने (ब-जमीन क्यू हत्यारे वगळून<br>३) लिव्ह व पेन्शनरी चार्जेस ०.२५ टक्के (आस्थापना खर्चावर)<br>४) संग्रहावरील तूट ०.२५ टक्के | <br>६२०.०२<br>---<br>१.५५<br>१९.३० |
| | **एकूण (ब)** | **६४०.८७** |
| | **एकूण (अ+ब)** | **९९३६.९७** |
| (क) | **वजाती**<br>१) विशेष टी ॲड पी वाहनावर (७५ टक्के) वैयक्तीक वहाने वगळून येणा-या रकमेवर<br>२) वैयक्तिक वाहनावर २० टक्के दराने<br>३) तात्पुरत्या इमारतीच्या किंमतीवर १५ टक्के दराने | <br>---<br><br>---<br>५.७६ |
| | **एकूण वजाती** | **(-) ५.७६** |
| | **एकूण प्रत्यक्ष खर्च (अ+ब)-क** | **९९३१.२१** |
| (ड) | **अप्रत्यक्ष खर्च**<br>१) वाहीतीलायक क्षेत्राच्या ८.०० टक्के दराने जमीन महसूल<br>२) लेखा व परीक्षण खर्च १.०० टक्के आस्थापना खर्चावर (बी जमीन वगळून)<br>३) सचिवालय चार्जेस<br>(आस्थापनेच्या खर्चावर ०.५० टक्के दराने) | <br>०.९५<br>७७.१८<br>०.७३ |
| | **एकूण अप्रत्यक्ष खर्च** | **७८.८६** |
| | **प्रकल्पाची एकूण किंमत** | **१००१०.०७** |
| | | |